राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राष्ट्रीय असंसर्गजन्य रोग नियंत्रण कार्यकमाकरीता जिल्हा स्तरावर ग्लुको स्ट्रीप, लॅनसेट व साहित्य सामुग्री खरेदी करीता प्रशासकीय मंजूरी देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०१७/प्र.क्र.१४/२०१७/आ -७
१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ३० जून, २०१७.

वाचा :- सह संचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग), मुंबई पत्र क्र.संआसे/NCD/ प्रशासकीय मान्यता/६५१५-६५१७/१६, दिनांक २८ डिसेंबर, २०१६.

प्रस्तावना :-

राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत सन २०१६-१७ च्या पीआयपीला केंद्र शासनाकडून मान्यता प्राप्त झालेली आहे. त्यानुषंगाने केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राष्ट्रीय असंसर्गजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमाकरीता राज्य स्तरावर ग्लुको स्ट्रीप, लॅनसेट व साहित्य सामुग्री खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

आरोग्य सेवा संचालनालयाने संदर्भीय दिनांक २८ डिसेंबर, २०१६ च्या पत्राच्या अनुषंगाने राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत एकूण रु. ४४७.७८ लक्ष चे आवश्यक असणारे ग्लुकोस्ट्रीप्स, लॅनसेट व साहित्य सामुग्री खरेदी करुन जिल्हा स्तरावर उपलब्ध करण्यासाठी निविदा प्रक्रिया करण्यास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर औषधी व साहित्य सामुग्रीची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू औषधी व साहित्य सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच याबाबींची खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) सदर खरेदीसाठी होणारा खर्च खालील नमूद लेखाशिर्षांतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

८) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

११) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा संचालनालय व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.४, नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदरहू प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२९१५१३१११९१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay R More

Digitally signed by Sanjay R More
DN: CN = Sanjay R More, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.06.30 11:44:33 +05'30'

**( संजय मोरे )**

**महाराष्ट्र शासनाचे उप सचिव**

**प्रत:-**

१) आयुक्त, कुटुंब कल्याण तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

२) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.

३) अतिरिक्त संचालक, कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
४) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
५) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
६) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
७) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
८) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
९) निवडनस्ती (आरोग्य-७)